


# बाल[illegible]

लेखक—नारायण गंगाधर लिमये, बी. ए., एल. टी.

प्रकाशकः—वि. स. गोगटे, बी. ए.
३२९ शनवार पेठ, पुणें शहर

किंमत ८ आणे.

# बालगीत



लेखक

श्रीयुत नारायण गंगाधर लिमये,

बी. ए., एल्. टी.

'जीवनलता,' 'करुणसिंह,' संगीत 'दमयंती नाटक'

इत्यादि पुस्तकांचे कर्ते.



पुस्तकें मिळण्याचीं ठिकाणें:—

(१) 'विजय' छापखाना, ५७० शनवार, पुणें शहर.

(२) श्रीयुत वि. स. गोगटे, बी. ए. ३२५ शनवार, पुणें शहर.

सन १९२३.

किंमत ८ आणे.

# बालगीताची अनुक्रमणिका.

## भाग १ ला.


| विषय. | पृष्ठ. |
|---|---|
| १ चिमुकला नमस्कार | १ |
| २ कोण मी ? | १ |
| ३ खोडकर मनी | २ |
| ४ अंकांचें गाणें | २ |
| ५ मी कसा शाहणा आहे? | ३ |
| ६ पापा देशिल कुणा तरी? | ३ |
| ७ हरवलेली बाहुली | ४ |
| ८ आमची शाळा | ५ |
| ९ आमचीं खेळणीं | ६ |
| १० मला करमत नाहीं ! | ७ |
| ११ बाजार, बाजर | ८ |
| १२ चेंडू | १० |
| १३ कवाइतीचा खेळ | १० |
| १४ बबू आणि बेडूक | ११ |
| १५ चिमणी | १३ |
| १६ आमचा राघू | १३ |
| १७ बाहुलीचा पाळणा | १४ |
| १८ पतंग | १५ |
| १९ भोंवरा | १६ |
| २० नाटक, नाटक ! | १७ |
| २१ पाऊस | १८ |
| २२ शूर उंदीर | २१ |
| २३ आगगाडी | २२ |
| २४ दिनूचा दिनक्रम | २४ |
| २५ आमचा मोत्या | २५ |
| २६ फुलांचा हार | २५ |
| २७ वाद्यें | २६ |
| २८ चांदोबा | २७ |
| २९ एका पैशाची कहाणी | २८ |
| ३० बाग | ३० |
| ३१ तो माझा चिमणा | ३१ |


## भाग २ रा.


| विषय. | पृष्ठ. |
|---|---|
| १ आनंदी चित्रकार | ३७ |
| २ दया | ३७ |
| ३ माझी सावली | ३८ |
| ४ आंधळा भिकारी | ३९ |
| ५ गवळी | ४० |
| ६ काठीचा घोडा | ४१ |
| ७ मोटार | ४२ |
| ८ मैना | ४२ |
| ९ "पुढें पुढे" | ४३ |
| १० भाऊ, भाऊ | ४४ |
| ११ थोरांचें स्वागत | ४५ |
| १२ वाऱ्याचे खेळ | ४६ |
| १३ पहिलाच प्रवास | ४७ |
| १४ दसरा | ४८ |
| १५ दिवाळी पाडवा | ४८ |
| १६ चार ओळींत रामायण | ४९ |
| १७ चार ओळींत भागवत | ४९ |
| १८ साधें पण सुंदर | ५० |
| १९ फुलपांखरूं | ५० |
| २० माझें पुस्तक | ५१ |
| २१ विनूचें गणित | ५२ |
| २२ तान्हुल्याची झांकली मूठ | ५३ |
| २३ कारंजें | ५४ |
| २४ झोंप नगरी | ५४ |
| २५ प्रभात | ५५ |
| २६ गिरणी कामगार | ५५ |
| २७ लहानगा नावाडी | ५६ |
| २८ सुंदर दंऊळ | ५६ |
| २९ बाजी देशपांडे | ५७ |
| ३० मातृभूमि ! | ५८ |

# प्रस्तावना.



कविता हा विषय बालगोपालांच्या मनोभावनांचा विकास करण्याचें एक चांगलें साधन आहे. मुलांचें ठायीं ईश्वराविषयीं प्रेम उत्पन्न करणें, सृष्टिविषयक, सौंदर्यविषयक वगैरे उच्च भावनांचा परिपोष करणें, रिकामपणीं मनाची सहजगतीनें करमणूक करणे, वाङ्मयाची सदभिरुचि लावणें, न कळत थोडा गोडसा व्यायाम घडविणें हे उद्देश कविता शिकविण्यानें साधतां येण्यासारखे असतात. मनोभावनांचा विकास गद्यापेक्षां पद्यानें अधिक चांगला होतो. शिवाय पद्य हें लक्षांत ठेवण्यास सोपें असून वारंवार आवडीनें म्हटलें गेल्यामुळें त्यांतील विचार मुलांच्या मनांत आपोआप दृढ होत जातात. परंतु मराठा बाल-वाङ्मयांत मुलांस योग्य अशा काव्याच्या पुस्तकांचा किती अभाव आहे हें सांगावयास नकोच. ही उणीव अंशतः भरून काढण्यासाठीं प्रस्तुत " बालगीत " पुढें येत आहे.

या पुस्तकांतील सर्व गीतें, मराठी वाचकांना कवि व लेखक या नात्यानें सुपरिचित असलेले श्रीयुत नारायण गंगाधर लिमये, बी.ए. एल्. टी. यांनीं रचिलीं आहेत. आज कित्येक वर्षें वऱ्हाडांतील व मुंबईतील प्राथमिक शिक्षकांच्या अध्यापन संस्थांवर यांनीं काम केलेलें असल्यामुळें लहान मुलांच्या कविता कशा असाव्या, मुलांस काय हवें असतें, वगैरे गोष्टींचें साहजिकच अनुभविक आकलन झाल्यामुळें **शिक्षणदृष्ट्या** या कवितांस एक प्रकारचें विशेष महत्त्व आहे. बालवाङ्मयांतील या पुस्तकाच्या दर्जासंबंधानें श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचा अभिप्राय पहावा.

या पुस्तकांतील गीतांचे साधारणतः पुढीलप्रमाणें वर्गीकरण करतां येईल:—१ ईश्वरविषयक २ सृष्टिविषयक ( अ ) प्राणिविषयक ( ब ) वनस्पतिविषयक ( क ) इतर ( ३ ) उपदेशपर ( ४ ) देशभक्तिपर ( ५ ) बालस्वभावनिदर्शक ( ६ ) हालचालींचीं किंवा

आविर्भावात्मक आणि संवादात्मक (७) विनोदी व इतर. परंतु या वर्गीकरणापेक्षां कवितांचा अनुक्रम मुलांच्या वाढत्या वयानुरूप म्हणजे काठिण्यानुसार ठेवणें इष्ट वाटल्यावरून तसें केलें आहे. त्यामुळें क्रमामध्यें अनायासें एक प्रकारें विषयवैचित्र्य आलें आहे.

हीं गीतें म्हणतांना मुलांस झेपतील असे हावभाव त्यांचेकडून करवून घ्यावे. ते कोणते व कितपत करून घ्यावयाचे तें शिक्षक व पालक यांनीं ठरवावें. पुस्तकांतील एकंदर संगीताच्या चाली व वृत्तें यांची संख्या सुमारें ३०-३५ होईल. शिवाय कांहीं गाण्यांस दोन अगर अधिकही चाली लावतां येतील हें तज्ज्ञांस समजेलच.

एकादें गीत सबंध पाठ करून घेणें इष्ट न वाटल्यास कांहीं कडवीं वगळून संबंध सुटूं न देतां शिकविण्यास हरकत नाहीं.

या पुस्तकाचें काम बऱ्याच रसिक व विद्वान् गृहस्थांनीं निरपेक्ष बुद्धीनें व केवळ वाङ्मयप्रेमामुळें आम्हांस मदत केली आहे. त्यांपैकीं रा० ब० दामोदर गणेश पाध्ये, एम्. ए. व श्रीयुत श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, बी. ए., एल्एल्. बी. यांचा प्रामुख्यानें उल्लेख करण्यास आम्हांस अभिमान वाटतो. त्याचप्रमाणें श्रीयुत नी. अ. ओक, एम्. ए., डे. ए. इ. मुंबई व रा. दा. के. ओक, बी. ए. प्रिन्सिपॉल, मराठी नॉर्मल स्कूल फॉर मेन, उमरावती, वगैरे शाळाखात्याच्या अधिकाऱ्यांनींही आपले अभिप्राय पाठवून आपलें पूर्ण समाधान व्यक्त केलें आहे. इतर ज्या विद्वान् व उच्च पदावर असलेल्या अधिकारी मंडळींनीं आम्हांस साहाय्य केलें आहे त्यांचा नामनिर्देश होऊं नये अशी त्यांची इच्छा असल्यामुळें नाइलाजानें आम्ही त्यांचा उल्लेख करीत नाहीं.

वरील सर्व विद्वान् रसिकांचे आम्ही अत्यन्त ऋणी आहोंत.

हें पुस्तक रसिकांना पसंत पडल्यास आणखी एक भाग छापण्याचें अश्वासन देऊन ही प्रस्तावना पुरी करतों.

पुणें,
ता० १८ मार्च १९२३.

**विनायक सदाशिव गोगटे.**
प्रकाशक.

# अभिप्राय.

ह्या पुस्तकांत लहान मुलांस आवडतील अशा निरनिराळ्या विषयांवर, प्रचारांत असलेल्या चालींवर व वृत्तांत लहान मोठीं सुमारें साठ गीतें आहेत. त्यांचे विषयही मुलांच्या वयोमानास अनुसरून त्यांस पसंत पडतील असेच आहेत. बालस्वभावदर्शक गीतें तर इतकीं मोहक आहेत कीं, मुलांसच नव्हे, तर त्यांच्या मातांसही मनोहर व मधुर वाटतील. स्वदेशाभिमान जागृत करणारीं गीतें स्फूर्तिदायक आहेत. ह्याखेरीज निरनिराळ्या विषयांवर अनेक गीतें आहेत तीं प्रस्तावनेंत लिहिल्याप्रमाणें, ज्या निरनिराळ्या हेतूनें लिहिलेलीं आहेत, ते हेतु उत्तम प्रकारें साध्य होण्यास खात्रीनें साधनीभूत होतील. रा० लिमये ह्यांच्या बऱ्याच कविता 'बालोद्यान' मासिकांत पूर्वीं प्रसिद्ध झालेल्या आहेत. त्यावरून ते बालवाचकांच्या परिचयाचे झालेले आहेत. आतां या पुस्तकाच्या द्वारें ते त्यांच्या वडील मंडळीपुढें येत आहेत. रा० लिमये ह्यांचा हा प्रयत्न पालकमंडळींस मान्य होऊन, ते त्यास भरपूर आश्रय देतील अशी मला आशा आहे.

उमरावती,
ता. २७।१।१९२३

दा. के. ओक, बी. ए.
प्रिन्सिपॉल,
मराठी नॉर्मलस्कूल फॉर मेन्,
उमरावती.

# अभिप्राय.



आपलें पुस्तक मीं काळजीपूर्वक वाचिलें. कवितांची निवड अर्थाच्या व भाषेच्या दृष्टीनें भिन्नभिन्न वयांच्या बालकांस अनुरूप अशीच बहुधा झाली आहे. कवितांचे विषय 'बेडूक', 'बाहुली', 'पतंग', 'भोंवरा', 'राघू', 'चिमणी' इत्यादि मुलांच्या परिचयाचे व आवडीचे असेच आहेत. प्रौढबालकांकरितां लिहिलेल्या कवितांपासून त्यांस सृष्ट पदार्थांचें, व्यवहाराचें, ऐतिहासिक व्यक्तींचें थोडक्यांत पण मार्मिक ज्ञान होऊन त्यांच्या अंगीं कर्तव्यनिष्ठा, स्वदेशप्रेम व ईश्वरभक्ति बाणावी अशी त्यांची योजना आहे. यांतील कवितांनीं मुग्ध बालकांपासून प्रौढ बालांपर्यंत सर्वांच्या बुद्धीचा व कल्पनाशक्तीचा विकास होईल अशी त्यांची रचना आहे. बहुतेक कवितांत गूढ किंवा उत्तान विनोद असल्यामुळें मुलांच्या ठायीं मनाचा समतोलपणा उत्पन्न करण्याच्या कामीं त्यांचा चांगलाच उपयोग होईल. सारांश, या सर्वांगसुंदर पुस्तकानें मराठी बालवाङ्मयांत अपूर्व व महत्त्वाची भर टाकिली आहे; व आपल्या मुलांची सर्वांगीण उन्नति इच्छिणाऱ्या मातापितरांनीं हें पुस्तक अवश्य संग्रहीं ठेवण्यासारखें आहे असें माझें मत आहे.

जळगांव, वऱ्हाड.
ता. ९।९।२२.
(सही) श्री. कृ. कोल्हटकर.

# बालगीत.





## १ चिमुकला नमस्कार.

(मालिनीवृत्त, किंवा राग बिहाग.)

सकलहि जग देवा! निर्गुनी पाळतोसी।
दिससि न, तरि सर्वां तूं सदा पाहतोसी।
मम हृदय शिशूचें, शक्ति न ज्ञान मातें।
नमन करितसे मी, मान्य होवो तुला तें॥

## २ कोण मी ?

( चाल—नृपममता.)

चालतों सदा मी जरिही।
तरि एक्या जागीं राहीं॥
मी दोन आपुल्या हातें।
मोजितों सदा वेळातें॥
चिमुकला, तरी नच दमतों।
चालतों, जगा चालवितों॥ **कोण मी?॥**

## ३ खोडकर मनी.

(चाल--पाळण्याची.)

चावट तूं कुठली । नख बोचे । मला तुझ्या पंज्याचें ।
खा चापट पोळी ॥ (थोपटते)
उपडी पातेली । तूं केली । छान दुधाची सगळी ॥
खा०॥ उंदिर तो सुटला । काय हवें-। आतां खायास नवें? ॥ खा० ॥ दोरा गुंतविला । आईचा । खेळनि तूं शिवणाचा ॥ खा० ॥ म्यांव् म्यांव् वर करिशी । तूं रुसुनी । लपशी का पांघरुणीं ॥ खा० ॥

## ४ अंकांचें गाणें.

(चाल-राम स्मरावा.)

अंकांचें पद छान ॥ म्हणूं या ॥ अंकांचें पद छान ॥ध्रु०॥
सूर्य असे वर एक, मला हे डोळे असती दोन। म्हणूं या०।
तीन दळें बेलास, मोजुं या चार फळ्याचे कोन ।
म्हणूं या० ।
हाता बोटें पांच, हे सहा या भुंग्याला चरण । म्हणूं या०।
सात वार, हे आठ पाय बघुं या कोळ्यास लहान ।
म्हणूं या० ।
सागरगोटे नऊ घेउनी ताई खेळे जाण । म्हणूं या० ।
एक ते दहा अंक मोजुं या आतां सारे मिळुन। म्हणूं या०।

## ५ मी कसा शाहणा आहें !

(शार्दूल विक्रीडित., किंवा राग मांड.)

कोणी दूध पितो, कुणी रस पितो, कोणी चहा पीतसे।
लाडू नावडता कुणा, परि कुणी तो रोज झोडीतसे।
कैरी चिंच कुणा रुचे, परि नको डोळ्यांपुढेंही कुणा।
खातों आंबट, गोड, मी तिखटही, आहें कसा शाहणा !॥

## ६ पापा देशिल कुणा तरी ?

(चाल-चला चला रे शाळेला.)

मामा:—

ये, ये बाळा लडिवाळा।
देई पापा रे मजला॥
दावूं का तुजला हम्मा ?।
येइं, तुझा मी ना मामा ?॥

मावशी:—

दिलास मज जर एक मुका।
तुझ्याजवळचा सरतो का ?।
बससी तुसता जसा मुका।
तुझी मावशी मी नच का ?॥

काका:—

देई पापा रे मजला।
खाऊ देतों मी तुजला।

तुला कडेवर घेऊं का ?।
नाहिं तुझा का मी काका ?॥

भाऊः—

चल बाहुलिच्या लग्नाला।
घे बाजा वाजविण्याला।
ये, तुज चेंडू का देऊं ?।
तुझा नसे का मी भाऊ ?॥

ताईः—

एक गोडसा मज देई।
तुझी असेना मी ताई?।
सारे थकले परोपरी।
पापा देशिल कुणा तरी?।

बाळः—

कोणी कांहीं मागुं नका।
बाहुलीस देईन मुका॥

---

## ७ हरवलेली बाहुली.



(चाल—गांजिता मला)

बाहुली कुठें ती गेली ?।
चुकली मुकली। लपली, रुसली॥
कीं कुणीं धरुनि तिज नेली ?॥ ध्रु ॥

नाहीं खाणें । नाहीं न्हाणें । तान्हेली ।।दमलेली।।
शोधुं मी कुठें मम छकुली ? ॥ १ ॥
दिवस कसा तरि । घालविला जरि। रात्रि मना। करमेना।
जरि निजे न ती मजजवळीं ॥ २ ॥
हट्ट न करिते । कधिंहि न रडते । परकर ही । नच मळवी।
शाहणी किती सोनुकली ? ॥ ३ ॥
मैत्रीण खरी। माझी तूं तरि। धांव गडे। ये इकडे।
का गडे 'गडी फू' केली ? ॥ ४ ॥
मीही रुसते । आतां निजतें । ये स्वप्नीं । बघुं हंसुनी ।
का पुरे न थट्टा झाली ? ॥ ५ ॥
बाई बाई। शर्थचि होई। उशिखालीं का निजली ?।
कशि लबाड ही सांपडली ॥ ६ ॥

---

## ८ आमची शाळा.

( चाल–आनंदाचा कंद )

आनंदानें सर्व मिळोनी जाऊं शाळेला चला।
गुरुचें ऐकुनि, लक्ष्य देउनी, अभ्यास करूं चांगला ।
वस्तु किती गमतीच्या तेथें मौज वाटते अंतरीं ।
चौकट गोट्यांची, ताशिं चित्रें, फळें, नकाशे किती तरी

माया करिती, मनापासुनी गुरुजी विद्याधन देती।
खेळ खेळती अपुणांसंगें सुंदर गोष्टी सांगती ॥
लेखन, वाचन, पाढे, कविता म्हणतां म्हणतां वेळ सरे।
बाग मनोहर पुढती दिसते शाळा घरचि गमे दुसरें।

* * *

कसें चिमुकल्या कोयीचेंही मोठें झाड पुढें होतें ।
बाळ आज, तरि थोर होउंया विद्या बहु शिकुनी येथें।

---

## ९ आमचीं खेळणीं.

१ नवा खुळखुळा खुळखुळतो। झटकन रडणें थांबवितो॥
२ कशी भिंगरी फेर धरी। डोले, खेळे ही भारी॥
३ 'चिवचिव' चिमणी रबराची। कशी ओरडे गमतीची॥
४ पहा फुगा हा कसा गडे। फुगुनी वाऱ्यावरी उडे॥
५ पहा बाहुला हा नकली। दाबितांच काढी जिभली॥
६ नवी पहा ही मोटार। रंगण घाली चौफेर॥
७ बंदुक उडते ही छान। शाहणी, न घे ही प्राण॥
८ सिंह साखरेचा नामी। खायाच्या परि तो कामीं॥
९ चित्रें गातीं हीं रबरी। एक सुरांचीं परि सारीं।
कपाटांत एका बसतीं। भांडण कधिंही नच करितीं॥

---

## १० मला करमत नाहीं.

(चाल–असा धरि छंद.)

काय करुं आई ?। अगदीं मज करमत नाहीं ॥धृ०॥
चेंडू अडगळींत हारपला।
दांडू चुलींत चुकुनी जळला।
गाडा चालुनि चालुनि थकला।
न सुचे कांहीं। आई, मज करमत नाहीं ॥ १ ॥
घोडा काठीचा तूं दिधला।
तो बघ कमळीनें पळवीला।
आतां जाउं कसा गांवाला? ॥ न सुचे० ॥ २ ॥
फुटला बाहुलिचा गे डोळा।
बाहुला हा लंगडा झाला।
तयार दोघेहि न लग्नाला ॥ काय करुं ॥३॥
मज जें खेळायास मिळालें।
'चट्टा मट्टा' करुनी सरलें।
तोंडीं बत्तासे विरघळले ॥ न सुचे० ४ ॥
पुस्तक गंगूनें फाडियलें।
पाटीचे बहु तुकडे केले।
पेन्सिल टाक खिशांतुनि गळले ॥ न सुचे०॥५॥
बंडू धडे वाचुनी निजला।
कोणी भांडाया मज नुरला।
खोड्या करण्या कुणि नच मजला ॥ न सुचे०॥६॥

माझें लक्ष न कोठें लागे।
झोंपहि मजला येईना गे।
तर मज छान गोष्ट तरि सांगें॥
काय करुं॥७॥

आई:—

खुळ्या! तुज कांहीं।
काम काय उरलें नाहीं?॥
खाशी गोष्ट सांगु का तुजला?।
तर मग जाई तूं शाळेला।
तेथें करमेल तुला बाळा॥
भुणभुण रे ही। मज मुळीं आवडत नाहीं॥

---

## ११ बाजार बाजार.



लबाड मुलगा:—

माझ्याजवळीं नाहीं पैसा।
विकत घेउं मी खाऊ कैसा?।
आतां फसवुनि विकणाराला।
घेउनि खावा फुकट मासला!॥

केळींवाला:—(ओरडत येतो.)

केळीं घ्या हो स्वस्त लाविलीं।
वसईचीं हीं केळीं पिकलीं॥

लबाड मुलगा:—

ए, ए, केळीं, उतरीं खालीं। (खाऊन पहातो.)
नको, उतरलीं! नेजा अपुलीं!॥

**चिवडेवाला:**—(ओरडत)

चिवडा घ्या हो खमंग फार।
वर लिंबाची घ्या ही धार

**लबाड मुलगा:**—(खातो)

काजूदाणे खवटचि झाले।
नको निवाले पोहे ओले!॥

**संत्रींवाला:**—(येतो)

संत्रीं घ्या हो मिठीं छान
आणिविलीं नागपुराहून॥

**लबाड मुलगा:**—(संत्रे खाऊन)

भिया किती? यांना या साली?।
नको, नको रे आंबट असलीं।

**वस्ताद मुलगा:**—(येऊन)

लाडू घ्या हो, लाडू घ्या हो।
अहा! स्वदेशी मेवा घ्या हो।

**लबाड मुलगा:**—

ये रे, ये, ये, बघूं मासला?।
'सांग, सांग कैसा शेर दिला'। ×

**वस्ताद मुलगा:**—

फुकट माल खा हा सडकूनी।
'धम्मक लाडू' "पाठ भरूनी"॥

[**वस्ताद मुलगा** पाठींत बुक्या मारतो. सर्व **विकणारेही लबाड** मुलास मारितात. सर्व जण पळून जातात.]

---

## १२ चेंडू.

(चाल-सज्ज करुनि)

चेंडू किति रंगदार गोल दिसत हा
टपटप हा खालिं पडे। त्वरित परी वरतिं उडे।
हातुनि मग सुटुनि दडे। सांपडे पुन्हां ! ।।
थयथय किति नाचे तो। डोळ्यांना नाचवितो।
उसळतसे, नच दमतो। खेळकर अहा ! ॥
खेळीं मन गुंग करी। दमवितसे नानापरि
हा तहान भूक तरी-। विसरवी पहा ॥

## १३ कवाइतीचा खेळ.

(चाल—चल गडे)

खेळुं या चला खेळ खासा ॥ नाना प्राणी। दावूं करुनी।
प्रथम करूं या जळमासा ॥ खेळुं या० ॥

२

घ्या अतां नवें रूप बसुनी ॥ बेडुक होऊं। गमती दावूं।
टुण टुण मारुं उड्या मिळुनी ॥ घ्या अतां ॥

३

या गडे टपूनी बसुंया ॥ होउनि दावूं। आतां माऊ।
खाउनि दुधलोणी निजुंया ॥ या गडे० ॥

४

या उठा, मजेनें खेळूं ॥ टेकूं गुडघे । आतां अवघे ।
घोडे होउनि दूर पळूं ॥ या उठा० ॥

५

या अतां उडूं या गगनीं ॥ गरुड भरारी । भरभर मारी
(पंजे हलवावे)
येऊं पुनरपि उतरूनी ॥ या अतां० ॥

६

होउंया पुन्हां बाल सारे ॥ गाणीं गाऊं । सकलां रमवूं ।
प्रभुला नमुंया प्रेमभरें ॥ होउंया० ॥

---

## १४ बाबू आणि बेडूक.

(अंजनीगीत)

एके दिवशीं फिरण्यासाठीं ।
बाबू जाय तळ्याच्याकाठीं ।
हांक ऐकिली त्यानें मोठी ।
'डरांव् डरांव्' ऐशीं ॥१॥
इकडे तिकडे मग तो पाही ।
त्याला कुणिही दिसलें नाहीं ।
'डरांव् डरांव्' हा शब्दचि येई ।
नकळे कोठूनी ॥२॥

बाबुस दिसली मग पाण्यावरि ।
बेडूक दादांची ती स्वारी ।
"कोण तुम्ही?" तो त्यांसि विचारी ।
'डरांव्' म्हणाला तो ॥३॥
'डरांव् डरांव्' तो बेडुक बोले ।
काय बोलतो बाबुस नकळे ।
बाबु म्हणे "हें गाणें कसलें?" ।
डरांव् म्हणाला तो ॥४॥
बाबु म्हणे "तूं अससि भुकेला"
आईबाप कुण्या गांवाला ।
सांग, सोडुनी गेले तुजला!" ।
'डरांव्' म्हणाला तो ॥५॥
"नांव गांव हें 'डरांव्' कसें रे! ।
'डरांव्' आई बाप सोयरे ।
गाणें खाणें 'डरांव' सारें" ।
'डरांव्' म्हणाला तो ॥६॥
बोलुनि बोलुनि बाबू दमला ।
कंटाळुनि जातांना वदला ।
"काय म्हणावें या मूर्खाला!" ।
'डरांव्' म्हणाला तो ॥७॥

---

## १५ चिमणी.



( चाल—अंजनीगीत किंवा राग विहाग )

धीट किती ही दिसते चिमणी ।
पटपट दाणे घेते टिपुनी ।
'चिवचिव' गाणें एकचि गाउनि ।। आनंदें राही ।।
टोंकदार तिज चोंच चिमुकली ।
बकुळीची जणुं ही छान कळी ।
गोजिरवाणी चिमणी छकुली ।। आनंदें राही ।।
गवत, पिसें, कापुस आणोनी ।
चिमणें घरटें बांधी चिमणी ।
तिथें पिलांना पाळी खपुनी ।। आनंदें राही ।।
टुणटुण उडते अंगणिं भारी ।
भुरकन् वरतीं घेइ भरारी ।
डौलें बसते मग झाडावरि ।। आनंदें राही ।।
घार, ससाणा, यांना बघुनी ।
घरट्यामाजी जाते पळुनी ।
देवाची ही साधी करणी ।। आनंदें राही ।।

---

## १६ आमचा राघू.



( दोहा, किंवा राग देस )

सुंदर राघू आमुचा आवडतो मज फार ।
पंखांची जणुं शाल ही अंगीं हिरवीगार ।।

जणों विड्यानें रंगली लाल तयाची चोंच।
पेरू मिरच्या खातसे, त्यांना मारुनि खोंच॥
मोजे घालुनि लाल कीं सजवी पाय लहान।
कंठीं काळी रेघ ही, ताईत जसा छान।
बोल किती तरि बोलतो राघू माझा गोड॥
म्हणुनि फळें मी घालुनी पुरवीं याचें कोड॥

---

## १७ बाहुलीचा पाळणा.

(बाहुलीस मांडीवर घेऊन मुलगी म्हणते:—)

निजनिज सोनुकले। कां बाळे। टकमक बघती डोळे?
डोल ग सोनुकले!॥
राघु तशा मैना। झोंपेल्या। निजुनी गेल्या सगळ्या।
नीज तुला येना?॥
मोडुं नये झोंप। तव, म्हणुनी। बाजा, झांज, पिपाणी
बसलीं गुपचूप॥
वाजवित्यें चुटकी, ।टाळी गे। छान खुळखुळा हा घे।
येवो तुज डुलकी। (थोपटते)
या आवाजानें। दूर पळे। बागुलबोवा बाळे।
निज आनंदानें॥
घेउं कडेवरतीं?। पाहिं वर। चांदोबाची कोर।
तारे खुणवीती॥

पाळणियांत झणीं। घालोनी। झोंके देत्यें जपुनी।
आमुची बाळ गुणी ॥ (पाळण्यांत घालून झोंके देते)
जो जो गे छकुले। कशि निजली। माझी थकली बाळी
जो जो गे छकुले ॥

---

## १८ पतंग.

( अभंग. किंवा राग मांड )

रंगीत कागद पातळ घेऊनी। पतंग चौकोनी।
केला नामी ॥
सरळ कांबीट लाविली त्यावरी। आडवी दुसरी
बांकदार ॥
शेंपूट तयाची लोंबे झोंकदार। दोऱ्याचा सुंदर
रूळ हातीं ॥
धर पाहूं आतां पतंग हातांत। दूर जा पळत।
माझ्यापुढें ॥
आतां सोड त्याला; मग मी दोरीला। देउनीया झोला।
उडवीन ॥
जाईल हा उंच गाणें गात गात। झोके खात खात।
आनंदानें ॥
उडेल मजेनें दोरीला धरून। दिसेल लहान।
उंच जातां ॥

घारीच्या सारखा पतंग दिसेल । वरतीं भेटेल ।
चांदोबाला ॥
हिंडावें फिरावें थंड हवेमध्यें । पतंगास वाटे ।
चिमुकल्या ॥
नाजुक पतंग दिसतो लहान । परी करी मन ।
आनंदित ॥

---

## १९ भोंवरा.

(वसंततिलका)

हा भोंवरा मज पहा पित्रळा मिळाला ।
या खोंवणी कितितरी दिसती तयाला ।
याची अणी सरळ चंचुसमान पाहा ।
डेखास पेरु लटके पित्रळा जणूं हा ॥
गुंडाळितों बघ सभोंवतिं छान दोरा ।
हा भोंवरा मग फिरेल झणीं भरारा ।
आतां पहा गरगरा फिरतो कसा तो ।
घेरी न ये, अचल गुंगत हा रहातो ॥
हातीं अतां फिरवितों उचलोनि त्याला ।
नानापरी रमवितां मम हा मनाला ॥

---

## २० 'नाटक नाटक!'

१ रविवार असे शाळा नाहीं।
अभ्यासाची नाहीं घाई।
'नाटक नाटक' खेळूं सारे।
करा तयारी उठा चला रे॥
१ ही घ्या घंटा देवापुढली।
२ फूटपट्टिची तलवार भली।
३ खोक्याचें हें घ्या सिंहासन।
४ मुकुट कागदाचा हा छान॥
१ पहा उपरण्याचा हा शेला।
२ पंचाचा मीं फेटा केला।
३ मीं आणिली कणसाची दाढी।
४ ही घ्या पडद्यासाठिं चौघडी॥
१ नाटक करुं या अतां कोणतें?।
करुं वेळेला सुचेल तें तें।
पुढें न होणें, पूर्वि न झालें,
दावूं नाटक नवें चांगलें॥
२ पात्रें साऱ्या नाटकांतलीं।
निवडक आणुनि दाखवुं सगळीं।
जमली किति तरि पहा मंडळी।
२ चला, वाजवा घंटा पहिली।

(आंतुनि हांक ऐकूं येते)

३ आंतुनि कोणीं हाक मारिली ?।
जेवायाची वेळ जाहली।
४ पुरती जुळण्यापूर्विंच अपुली।
हाय ! कंपनी कैशी फुटली ! ॥

---

## २१ पाऊस.



१लाः—

सर सर, सर हे मोत्याचे।
भर भर ओघळले कुठचे !।
पहा पहा हो पाउस हा।
तिरपा पडतो कसा पहा।।
गड्या पावसा ये इकडे।
जिकडे तिकडे घाल सडे।
आभाळांतुन आलास।
दमला असशिल तूं खास।
पाठविलें तुज चंद्रानें,।
सूर्यानें, कीं देवानें ?।
कौलाराच्या फटींतुनी।
घरांत येशी चोरूनी !।
विहिरिंत बेडुक बसे जसा।
घरीं अतां मी बसे तसा ॥

२राः—

कपडे हे माझे सगळे।
ओले चिंब पहा झाले।
चित्र जाइ हें विरघळुनी।
पतंग गेला फाटूनी।
रस्त्यावरी नदी झाली।
आली पाण्याला लाली।
कागद घेउनि नाव करूं।
नदींत सोडुनि दूर सरूं॥

३राः—

'घडघड' ढग हे गडगडती
'चमचम' चमके वीज किती।
'सों सों' येई मग वारा।
'थड थड' पडती किति गारा।
'सरसर' खालीं सर येते।
'चटचट' झाडावरि पडते।
'धो धो धो' वाहति नाले।
'खळ खळ खळ' पाणी खवळे।
'झिम झिम' पाउस ये आतां।
'चिक चिक' हा झाला रस्ता।
पानावरचे थेंब किती।'
'टपटप' ठिबकुनि हे पडती।

४थाः—

पडति सरीवर किती सरी ।
एक दुजीवर मात करी ।
तारा वरुनि रुपेरी या ।
आल्या कोणा वर न्याया? ॥
झाडें पाणी बहु प्यालीं ।
ताजितवानीं मग झालीं ।
ओढे त्याविण अटतील ।
शेतें सारीं सुकतील ॥

५वाः—

वाहत होती सुंदरशी ।
बुडुनी गेली नाव कशी? ।
ऊं, ऊं, दादा दे दुसरी ।
रुसेन बघ मी नाहिं तरी ॥

६वाः—

बाळा चटकन ढग फुटले ।
नकळत कैसे हे जमले? ।
ही घे दुसरी नाव तुला ।
खेळ मजेनें, हांस मुला ।
आभाळाला येइ रडें ।
तोंच कसें हो ऊन्ह पडे ।
रडण्यामाजीं हंसें मिळे ।
उन्हांत पाउस फार खुले! ॥

## २२ शूर उंदीर.



१ ला उंदीरः---चला चला रे चला चला।
लढावयाला उठा चला
रात पडे रवि मावळला।
दिवा घरांतिल मावळला।
सर्व माणसें दमलेलीं।
माडीवरि झोंपीं गेलीं।
जिकडे तिकडे अंधेर।
निघूं बिळांतुनि बाहेर।
पहा फळीचा किल्ला तो।
बुरुज टोपलीचा दिसतो।
या दातांच्या भाल्यांनीं।
किल्ला टाकूं पोखरुनी॥
लाडू, बरफी, पुऱ्या, वड्या।
यांवर मारूं अतां उड्या॥
२रा उंदीरः--लहान असलों तरि सारे।
उडवुनि देतों कोठारें।
शेंपुट शोभे दोर जसा।
सुयाच काळ्या दिसति मिशा।
दांत कट्यारी, नखें खिळे।
आह्मीं आपण वीर भले।

चला शूर हो चाल करूं।
मारूं, अथवा स्वतां मरूं।
लाईवरि मारूं धांव।
गजाननाचें घ्या नांव॥
(सर्व जण डोळे मिटतात)

म्हातारा उंदीरः—अरे कोण तो।
बोका दिसतो। कैसा बघतो।
१ला उंदीरः—फराळ हाय! अतां कसला।
म्हातारा उंदीरः—फराळ तोचि करिल अपुला।
सर्वजणः—इकडे चोर पहा आला।
पळा, शूर हो, पळा, पळा!॥

---

## २३ आगगाडी.



एंजिनः—
सर्वांचा मी असे पुढारी। माझ्यामागें गर्दी भारी।
मला कोळसे लागति खाया। अतिशय पाणी लागे प्याया।
सुटण्यापूर्वी शीळ फुंकितों। भप् भप् भप् भप् करित धांवतो।

फर्स्ट क्लासः—
गाद्या, पंखे पहा आरसे।
पहिला नंबर खरा मी असे।

सुचवि रेघ बाहेरिल देखा।
"मी श्रीमंताकरितां एका"।

थर्ड क्लासः—

उच्च नीच मध्यम लोकांचें।
वारुळ भरलें जणुं मुंग्यांचें।
अंक तीन हा पहा सुचवितो।
"त्रिभुवन मी सकलां दाखवितों"॥

स्त्रियांचा डबाः—

पाटी बाहेरिल ही वाचा।
डबा असे मी पहा स्त्रियांचा।
पोरांबाळां देतो ठाव।
पुरुषांना करितों 'मज्जाव'॥

पोष्टाचा डबाः—

डबा असे हो मी पत्रांचा।
पुडापुडांचा, जसा विड्याचा।
कसा रंग मम खुलतो लाल।
या गाडीला म्हणती मेल॥

रेस्टॉरंटकारः—

भोजनगृह हें असे चालतें।
खायाप्याया तुम्हांस देतें।
पहाल मेजें, चमचे, कांटे।
दिवाणखान्याहुनि मी थाटें॥

गार्डाचा डबाः—

अंसे डबा मी जरी शेवटीं ।
शिटी निशाणें माझ्या हातीं ।
इंजनही मम आज्ञेविण तें ।
कधिं न जागचा पाय उचलितें ॥

सर्व डबेः—

नागीण जशी वळणें घेई ।
तशी आगगाडी अमुची ही ।
पूल, टेंकड्या, दऱ्यांवरूनी ।
भप् भप् भप् भप् जाई निघुनी ॥

---

## २४ दिनूचा दिनक्रम.



(शार्दूलविक्रीडित)

आधीं ऊन चहा हवा मग वडी ‘तोंडामधें’ टाकण्या।
लागे पापडभात, नंतर बसे बापापुढें जेवण्या ।
जेवे आइसवें पुन्हां, चुरमुरे ‘खेळावया’ लागती ।
घेई लाडु दुपारचा, मग चहा, जेवे पुन्हां, शेवटीं ।
खाऊला चिकटे दिनू दिनभरी, जैसा गुळा मुंगळा ।
खाण्यावांचुनि जाइ रात्र, सगळी, तें दुःख हो त्याजला ।
पोटाचें जणुं ढोलगें लटकलें छातीवरूनी पुढें ।
काड्या शोभति हातपाय, मुलगा ऐसा कुणा आवडे? ।

---

## २५ आमचा मोत्या.

(साकी, किंवा राग पिलु.)

मोत्यांसम हा स्वच्छ पांढरा मोत्या माझा दिसतो।
सदासर्वदा माझ्यामागें छायेसम असतो ॥
शोभे सुंदर पहा तयाच्या कपाळीं टिळा नीट।
देवाजीनें त्यास जन्मतां जणों लाविली तीट ॥
हांक मारितां दचकुनि पाही, वेगें धांवत येई।
मज जीवापरि जपतो, जागत रात्रिं उशाशीं राही॥
हौसेनें हा चेंडू नेई तोंडामाजी धरुनी।
कंटाळेना, पुन्हां फेंकतां माझ्या जवळी आणी ॥
कधि हाताचे पाय करोनी मी मोत्यासम पळतों।
परि मागिल पायांवर दोनच, मौजेनें हा बसतो ॥
मनीसारखा कधिंही मोत्या घरीं बसे नच लपुनी
मित्र शाहणा, विश्वासु गडी यासम हाच इमानी।

---

## २६ फुलांचा हार.

१ साधी घ्या हो सदाफुली।
दारोदारीं ही फुलली।
२ ही घ्या पिवळी शेवंती।
पाना आड दिसे मज ती।

३ घार पाकळ्यांची जाई ।
जशी चांदणी लहान ही ॥
४ सुंदर चांफा सोनेरी ।
बागेमाजी वास भरी ॥
५ पारिजात हें बारिकसें ।
भामा ज्यास्तव बहुत रुसे ॥
६ असे मोगरा किती गुणी ।
बघ माझी खुलवी वेणी ॥
७ गोड गुलाबाचें फूल ।
मना पाडितें हें भूल ॥
८ कमल पहा हें मनोहर ।
लक्ष्मीचें कीं माहेर ॥
सर्वः—नानाविध घेउनि सुमनें ।
हार करूंया हौसेनें ॥
एकीनें सौंदर्य कसें ।
पहा जगांतिल वाढतसे ॥

---

## २७ वाद्यें.



(चाल—नाचत ना गगनांत.)

सर्वः—

मौजेचा हा वेळ । आतां । वाद्यांचा करुं खेळ ॥ध्रृ०॥
पक्षी गाती । वारे गाती ॥ गाती निर्झरमाळ ॥ १ ॥

१ लीः—वाजविते मी। झांजा नामी। आकारें या गोल२
२ रीः—हातीं चिपळ्या। या मीं धरिल्या। ऐका यांचा
ताल ॥ ३ ॥
३ रीः—मृदंगवाणी। ही ऐकोनी। माना डोलावाल ॥ ४
४ थीः—ऐकावा जल–। तरंग कोमल। टेंकुनि हाता
गाल ॥ ५ ॥
५ वीः—वीणा-नादा। करुनि शारदा। काढि जिते मधु-
बोल ॥ ६ ॥
६ वीः—मुरली-स्वर ते। बहु आवडते। शिरतिल हृदयीं
खोल ॥ ७ ॥
सर्वः—
वाजवुं सगळीं। एक्या वेळीं-। नूतन गीत सुरेल ॥ ८ ॥

---

## २८ चांदोबा.

मुलगा—

आई तें वर काय दिसे ?
वाटोळा आरसा असे ?
चेंडू सुंदरसा चमके ?
दिवा विजेचा कीं लटके ?
शुभ्र फुलांचा गुच्छ भला
का आकाशीं सो बगळा ?

किंवा शुभ्र घड्याळाची
असे तबकडी मौजेची ?
नवी ताटली चांदीची
धार नेतसे कोणाची ?
ये न सांगतां काय तुला !
चांदोबा ! मी ओळखला.

---

## २९ एका पैशाची कहाणी.

( अंजनी गीत. )

बाळा माझी ऐक कहाणी ।
खाण असे ती माझी जननी ।
आलों निघुनी तिजपासोनी ।
सदा प्रवासी मी ॥ १ ॥
स्वच्छ अंग भट्टींत जाहलें ।
मला टांकसाळीमधिं नेलें ।
वाटोळें मग रूप लाभलें ।
सदा प्रवासी मी ॥ २ ॥
छाप मारितां नाणें बनलों ।
मग ऐटीनें चालुं लागलों ।
मुका, तरिहि बोलका जहालों ।
सदा प्रवासी मी ॥ ३ ॥

मित्रांच्या सहवासीं रमलों ।
पिशवीमध्यें बसुनि राहिलों ।
कांहिं दिसांनीं तिथुनि निघालों ।
सदा प्रवासी मी ॥ ४ ॥

हलवायाच्या घरीं पातलों ।
पेढे बरफी खात राहिलों ।
मग कृपणाच्या हातीं गेलों ।
सदा प्रवासी मी ॥ ५ ॥

त्यानें मजला घरीं आणिलें ।
पेटिंत कोंडुनि मलिनचि केलें ।
परि चोरानें चोरुनि नेलें ।
सदा प्रवासी मी ॥ ६ ॥

गर्दीतुनि तो जाई जेव्हां ।
पडलों खालीं हळूंच तेव्हां ।
रस्त्यावरि तुज सांपडलों हा ।
सदा प्रवासी मी ॥ ७ ॥

मूल्य न वाटे श्रीमंताला ।
माझें कौतुक परि गरिबाला ।
जरी असे मी पहा चिमुकला ।
सदा प्रवासी मी ॥ ८ ॥

आतां मज दे अंधाहातीं ।
आवडेल ही प्रभुला सत्कृति ।

पडेल माझी वाग न तुज ती।
कसा प्रवासी मी ? ॥ ९ ॥

---

## ३० बाग.

( चाल—जाऊं कामाला. )

१ ली टोळी—
खुरपीं घेउनिया। आधीं जमीन उकरूं या ॥
वाफ्यामध्यें खत घालोनी बीजें पेरूं या ॥
सख्यांनों पाणी घालूं या। खडे हे काढुनि टाकूं या।
आळस तैशीं सुकलीं पानें सारूं दूर अतां। खुरपुनि टाकूं या गवता।
मग त्या येतिल वृक्षलता ॥
२ री टोळी—
( चाल—ब्यांडची " ता ता ता, ता ता ता " )
बायांनों या हातीं झारी घेऊं।
वृक्षांना या पाणी आतां देऊं।
कैसे हे पाणी शोषूनी घेती।
डोलोनी आनंदें पुष्पें देती ॥
३ री टोळी—
( चाल—फुलें सुवासिक हीं. )
बाग कशी फुलली। सख्यांनों।
तरु-लतांस कोणीं फुलें चिमुकलीं सुंदर हीं दिधलीं ?

हीं दिलीं जयानें त्याच्या वाहूं चरणीं ।
वेणींत घालुं या कांहीं प्रसाद म्हणुनी ।
या गुंफुं माळ खालीं बसोनी ॥

## ३१ तो माझा चिमणा.

( अंजनी गीत, किंवा राग विहाग.)

दुडदुड चाले करुनी घाई ।
हांसत हांसत मुरडुनि पाही ।
मुळिही निचळा रहात नाहीं ।
तो माझा चिमणा ॥
घडवंचीचा डोंगर चढुनी ।
पडुनी, घेतो खोक पाडुनी ।
मग वाजवितो सनई, रडुनी ।
तो माझा चिमणा ॥
घेउनि दौती उपद्व्या करितो ।
अंगावरतीं सांडुनि घेतो ।
लाल निळा मग वानर बनतो ।
तो माझा चिमणा ॥
चेंडू समजुनि पेरू फेंकी ।
मुखीं बाहुली चावुनि टाकी ।
पांगुळगाडा घेई अंकीं ।
तो माझा चिमणा ॥

"हम्मा" "पापा" "भो भो" म्हणतो ।
अर्थ तयाचे किति तरि करितो ।
मज न कळे तरि रागें भरतो ।
तो माझा चिमणा ॥

पदराखालीं राही लपुनी ।
घट्ट धरी निज डोळे मिटुनी ।
हुडकाया मग सांगे हंसुनी ।
तो माझा चिमणा ॥

वदनिं आंगठी न कळत लपवी ।
आईला शोधाया लावी ।
थकल्यावरि ती काढुनि दावी ।
तो माझा चिमणा ॥

मोठे जोडे घाली पायीं ।
ठेवी पगडी अपुल्या डोई ।
चढुनि कडेवर मोठा होई ।
तो माझा चिमणा ॥

वाघ कोंकरूं मांजर चिमणी ।
मांडुनि सारे एक ठिकाणीं ।
मैत्री त्यांची दे घडवोनी ।
तो माझा चिमणा ॥

चाकांवांचुनि गाडा चालवि ।
मग काठीचा घोडा सजवी ।

लेखणीस जो बंदुक बनवी ।
तो माझा चिमणा ॥
एक पाटिच्या दोन बनवितो ।
डाळ तांदुळां एकचि करितो ।
हांसुनि वरतीं टाळ्या पिटतो ।
तो माझा चिमणा ॥
"खालीं वरतीं" पळतांना तो ।
हृदय आइचें तसेंच करितो ।
भिववी तिज, परि जो नच भीतो ।
तो माझा चिमणा ॥
जागा असतां हंसवी इतरां ।
परि निजतां तो, करमे न जरा ।
अंधारांतिल एकच तारा ।
तो माझा चिमणा ॥

( भाग १ समाप्त. )

## १ आनंदी चित्रकार.

( राग मांड, ताल दादरा, मात्रा ६.)

आनंदी चित्रकार धन्य तो विधाता ॥धृ०॥

गगनाचा पट पसरी
इंद्रचापिं रंग भरी ॥
निजकृतिची त्यास परी ।
पुळिं नसे अहंता ॥ १ ॥
फल कुसुमें नानापरि ।
चित्रित मृग-विहग करी ॥
निर्मितसे सुख-लहरी ।
नमन त्या अनंता ॥ २ ॥

---

## २ दया.

( दिंडी. )

गोगलगाय म्हणते—

नको माझीं बालका ! ओढुं शिंगें ।
इजा तेणें ती कुणां होय सांगें ? ।
नको चिरडूं मम अंग तूं मजेनें ।
घडविलें प्रभुनें जाण चतुरतेनें ॥ १ ॥
भूमि, जल, वारा, तसा हा प्रकाश ।
असे धन हें रे ! समाईक खास ।

थोर देवाच्या कृपेचा मलाही ।
घेउं वांटा दे, प्रार्थना तुला ही ॥ २ ॥
सर्व ठेवा घर नको पाडुं माझें ।
तुझ्या उपयोगीं पडेना मुळीं जें ।
जाण बाळा, यापुढें तुझ्यासाठीं ।
दुर्जी कामें पडलीं कितीक मोठीं ॥ ३ ॥
जीव हरणें सोपें गमे कुणाही ।
तोच भरणें देवास मात्र येई ।
तुझा जीव तुला, तसा मला माझा ।
सोड मज, दुसरा खेळ खेळ तूं जा ॥ ४ ॥

---

## ३ माझी सांवली—



(झिंजोटी.)

किति गमतीची दिसत सावली ।
मी किति गोरा, ही किति काळी ॥ ध्रु० ॥
दूर पसरते सांज सकाळीं ।
तीच दुपारीं होय चिमुकली ॥ १ ॥
* * *
डोले मजसम, बोले न मुळीं ।
राक्षसिनी जणुं ही गोष्टिंतली ॥ २ ॥
* * *
सोडी न मला, चिकटुनि राही ।
मीत कुणा कीं, समजत नाहीं ॥ ३ ॥

---

## ४ आंधळा भिकारी.



(चाल—नृपममता.)

हा गरीब दीन भिकारी। बसला देवाच्या दारीं।
आंधळा ॥
होतांच सकाळ, इथें तो। बैसतो सांजपावेतों।
एकला ॥
'राम राम' यावांचूनी। बोलेना शब्दचि वदनीं। वेगळा॥
सावली असो वा ऊन। जरि जोराचा ये पवन। बैसला॥
हे पशुपक्षी झाडें हीं। बापुड्यास न दिसे कांहीं।
दृष्टिला॥
दिवस रात्र एकचि त्याला। दीप, चंद्र, सूर्यहि काळा।
त्याजला॥
दाखवी वाट त्या काठी। ती मैत्रिण त्याची मोठी।
प्रेमळा ॥
कुणि कांहीं त्यास न देती। वरि हंसुनि मात्र दुखवीती।
त्याजला ॥
पै दिडकी टाकुनि दुरुनी। थोरपणा दाविति कोणी।
आपला ॥
तो बघे चाचपुनी नाणीं। हातांसाचि डोळे मानी।
आपल्या॥
तूं जितका प्यार प्रभूला। तितकाच असे हा बाळा।
आंधळा॥

देउंया। अन्न खावया। वस्त्रही तया। पांघरावया।
दिसे थकलेला। किति असे गरीब भुकेला। आंधळा॥

---

## ५ गवळी.



(चाल–वसंतीं बघुनि मेनकेला.)

सकाळीं देवाला नमुनी।
गाइ वासरां प्रेमें देतों मी चारा–पाणी ॥ १ ॥
त्या मज बघुनी हंबरती।
घेति दोरिला ओढ वांसरें, उतावळीं होतीं ॥ २ ॥
घालुनि गाईंना चूण।
झणीं वासरां सोडुनि देतों दूध पिण्या ऊन ॥ ३ ॥
भरुनी गुडघ्यामधिं चरवी।
रमत एकटा धार काढितों भर भर भर बरवी ॥४॥
चरव्यांवर चरव्या भरुनी।
कावडींत फेंसाळ दूध तें निघतों घेऊनी ॥ ५ ॥
जातों मग दारोदारीं।
मुलें पाहती वाट दुधाची, वाटी धरुनि करीं॥ ६॥
चरतां गाई मग रानीं।
वाजति घंटा गळ्यांतल्या, त्यांवरि गातों गाणीं॥७॥
संध्याकाळीं घरिं येती।
गाई वनिंचा खाउनि चारा, धार पुन्हां देती ॥८॥

माझें जिवंत-धन गाई।
जपतों त्यांना जिवापरी मी रात्रंदिन पाहीं ॥९॥
ज्यांना पाळियलें हरिनें।
त्या गाईचे वंश राखितों सदैव ममतेनें ॥१०॥

---

## ६ काठीचा घोडा.

(चाल-यमपाश गळ्याशीं.)

भरधांव। मारितो धांव। असा हा घोडा।
त्यावरी बसाया मला एकटा सोडा ॥ १ ॥
त्याप्रती। मूल्य तरि किती?। तरी पण त्याची।
वाटते खरोखर कामगिरी मोलाची ॥ २ ॥
कधिं तरी। पित्याच्या करीं। फिराया जाई।
परि दमणें त्याला अगदीं ठाउक नाहीं ॥ ३ ॥
बेभान। करी थैमान। कशाची वाण?।
हा चपळ असे मम "मनासारखा" जाण ॥ ४ ॥
किति धीट। धांवतो नीट। खोड नच त्यास।
रोज रोज करितो घोडा हा उपवास ॥ ५ ॥
खोगीर। लगामहि नाल। उगीच तया तीं?
बंधनें कशाला तोचि असे जर हातीं ॥ ६ ॥
चाकरी। कुणी नच करी। खडा सेवेला।
विसरुनी स्वतांच्या तरी तहान भुकेला ॥ ७ ॥
बहुगुणी। राहतो स्मरणिं। वर्णुं किति याचे?।
मनिं आणा शिशु हो! इमान या प्राण्याचें ॥ ८ ॥

---

## ७ मोटार.

(चाल--तूं टाक चिरुनि ही मान.)

ही मोहितसे मोटार । मनाला फार ॥
एकदां बसावें तिजमध्यें ही हौस मना अनिवार ॥ध्रु०॥
तिज वाटोळे पद चार । शिरिं काळी छत्री थोर ।
ही श्रीमंताला प्यार । मागुनी अचानक येइ भुतासम,
पळवि जनाला दूर ॥ १ ॥
तिज मागें पुढतीं डोळे । दिवसां ते दिसती मिटले ।
परि रात्रीं उघडुनि चाले ॥ स्वर 'पों पों' काढी,
'अंगांत' जणों होइ तिच्या संचार ॥ २ ॥
वाटेंत खेळवी बाळा । आट्यापाट्याच्या खेळा ।
धूळींत पाडिते त्याला ॥ थांबुनी थरथरे, हींव जणुं
भरे; तरि धांवे बिनघोर ॥ ३ ॥
पायांत 'वात' जरि भरला । तरि धावण्यांत ही चपला ।
घाम न ये मुळिं अंगाला ॥ परि कधीं रुसुनि ही पायहि
नुचली, टाकि दुज्यावरि भार ॥ ४ ॥

---

## ८ मैना.

कोकिळ मंजुळ गाइ वसंतीं ।
बुलबुल 'बुलबुल' गातो रातीं ।

मैनाताई! गासी कविही।
कविसम सारे लहरी गवई॥ १ ॥
बोल तुझे मंजुळ ऐकूनी।
रमतों त्यांच्या मी अनुकरणीं।
असते पंख जरी मजला गे।
आलों असतों नभिं तुज संगें॥ २ ॥
सहज तोलुनी चिमणें अंग।
डुलत चालशी गानीं दंग।
पट्टे पंखावरिल पांढरे–।
उडतांना तूं, दिसति गोजिरे॥ ३ ॥
पाय चोंच हीं दिसतीं पिवळीं।
हळद् लावुनी नवरी नटली।
साधी भोळी काळि सांवळी।
भावि सुखांमधिं गुंग जहाली॥ ४ ॥
गरुडासम गे उंच भरारी।
येइ मारतां तुज न अंबरीं।
परि बागडसी तूं उद्यानीं।
आनंदाची मूर्ति मोहिनी॥ ५ ॥

---

## ९ "पुढें पुढें."

गिरिरायाचा बाळक हा। चाले झुळझुळ झरा पहा।
कसा शिलेच्या अंकीं हा। उडे, बागडे, हंसे, अहा!।

एकीजवळुनि दुसरीला—। हा जाई भेटायाला।
स्वस्थपणाचा कंटाळा। जन्मतांच वाटे याला।
बोल बोबडे चपळ झरा। बोलत चाले झराझरा।
नाच, उड्या, नाना खेळ। शिकुनी घ्यावे याजवळ।
पहावयाला जग सारें। निघे एकला हर्षभरें।
खोल भयंकर किती दऱ्या। 'आ' करुनी येती खाया।
जबडयांतुनि परि त्यांच्या हा। सुटुनि जातसे पुढें पहा
शेतांतुनि, गांवांतुनि तो। किती पुलांखालुनि जातो।
सपाट मैदानावरतीं। मोदें हळुहळु धरी गति।
कसा उतारावरुनी तो। खळखळ मौजेनें पळतो।
दहा पावलें जाइ पुढें। तों दिसती विक्राळ कडे।
पाहुनिया नच डगमगला। स्वस्थ न तेथें तो बसला।
दंड ठोकुनी घेइ उडी। किति धीराचा शूर गडी।
ध्येय सोडिलें नच त्यानें। "पुढें पुढें" हा मंत्र म्हणे।
लहान असुनी। फिरतो भुवनीं। भीति न मानी।
नर्तन, गायन, खेळ करी। जगांतही आनंद भरी॥

---

## १० भाऊ भाऊ.



(बिहाग. चाल—बाल मुरे.)

(१)

आपण भाऊ, तर राहूं एकमतें, कलह नसो हृदयीं।
ऐक्य सुखाची खाणचि जगतीं॥ ध्रृ०॥
एकच आईच्या मृदु हातीं। घांस जेवलों तिचिया पुढतीं
बसुनी प्रेमें एकच ताटीं॥ १॥

एकचि अपुला असे पाळणा । एकचि गाणें निजवी आपुणां । घडलें सारें याच घरीं ना ? ॥ २ ॥

( २ )

विद्या केली एकचि सदनीं । खेळ खेळलों त्याचि अंगणीं हंसलों रमलों गाउनि गाणीं ॥ ३ ॥
मृगपक्षीही कलह न करिती । सुखें आपुल्या घरांत रमती । मनुजालागीं बोध शिकविती ॥ ४ ॥
कलहास नको थारा चित्तीं । खुलो जागती प्रेमज्योती । ज्योंवारि अपुलीं हृदयें उडतीं ॥ ५ ॥

---

## ११ थोरांचें स्वागत.



(राग--मल्हार. चाल-शांत हरि हास्य धरि .)

बालजन आदरें करिति सुस्वागता ॥ धृ० ॥
सुजन येई घरा तोचि दसरा असे ।
दर्शनें सुखवितां, मेघ मोरां जसे ॥ १ ॥
वनिं वसंता बघुनि कोकिळा कंठ तो ।
फुटतसे गोडसा, मोद मनिं दाटतो ॥ २ ॥
तेंवि बघुनी तुम्हां हुरुप ये गायना ।
बोबडे बोल, तरि गोड त्यांतें गणा ॥ ३ ॥
फार उपकार अजि शिशुवरी जाहले ।
थोर ऋण फेडण्या नमन हें चिमुकलें ॥ ४ ॥
मंगलाशीर्वचें धन्य बालां करा ॥
सौख्य लाभो तुम्हां, विनति ही प्रभुवरा ॥ ५ ॥

---

## १२ वाऱ्याचे खेळ.



( चाल-फुलें वेलीचीं. )

खेळ बाळाचे । किति सांगावे मौजेचे ? ॥ धृ० ॥

कोणी 'मज्जाव' न त्यास करी ।
फिरतो कोठेंही हा लहरी ।
फिरण्यावांचुन हौस न दुसरी ॥ खेळ० ॥ १ ॥

घरचें लावुनि बसतां दार ।
अवचित देउनि धक्के फार ।
जीवा कोण करी बेजार ॥ खेळ० ॥ २ ॥

छत्री, टोपी हा वर उडवी
वरतीं शीळ वाजवुनि चिडवी।
खोडी काढुनि पोरां रडवी ॥ खेळ० ॥ ३ ॥

निशिदिनिं झाडीमाजी शिरुनी ।
सांगा कोण गातसे गाणीं ? ।
नाचवितो लाटांना दुरुनी ॥ खेळ० ॥ ४ ॥

रमतो एकलाच उद्यानीं ।
कुसुमें घेईना तोडोनी ।
केवळ वास बरोबर आणी ॥ खेळ० ॥५॥

उडवुनि नेई उंच पतंगा ।
फिरवी गगनीं कोण विहंगा ।
न दिसे परि तो झोंबे अंगा ॥ खेळ० ॥ ६ ॥

वेगें वातचक्र जो फिरवी
फडफड उंच निशाणें उडवी ।
होडी सागरांत जो पळवी ॥ खेळ० ॥ ७ ॥

दाट धुळीच्या गोल विमानीं ।
सुकल्या पानांला बसवूनी ।
नेई कोण बरें तो गगनीं ? ॥ खेळ० ॥ ८ ॥

घेउनि जाइ पराग फुलांचे ।
घडवी फळ सुंदर मग त्यांचें ।
करितो हित लतिकावृक्षांचें ॥ खेळ० ॥ ९ ॥

---

## १३ पहिलाच प्रवास.



( राग—झिंजोटी. )

हंसत हंसत हळुहळु बघ बाळ कसा चाले ॥
प्रथम पद जपूनि टाकि, चित्र जणूं हाले ॥ ध्रु० ॥
बालवीर करि साहस । जीवा पडती प्रयास ।
करितो पहिला प्रवास; । नाव जणूं डोले ॥ १ ॥
दोन पदांचीच वाट, । परि त्याला होय बिकट ।
प्रेम तरी नेइ नीट । त्यास, नवल झालें ॥ २ ॥
खगाचि उपा देवीला । सामोरा हा छकुला ।
जात गात जननीला, । दोन एक झाले ॥ ३ ॥

---

## १४ दसरा.



( शार्दूलविक्रीडित. किंवा राग केदार.)

सोन्याचा दिन आज येइ दसरा आनंद होई खरा।
मारायाप्रति रावणा निघतसे श्रीराम लंकापुरा।
देवी अष्टभुजा रणांगणिं लढे रात्रीं नऊ जागुनी।
मारी त्या महिषासुरा निजबळें, संतोषली मेदिनी ॥
सोन्याची करुं देवघेव अवघे प्रीती धरोनी मनीं ;
होवो रम्य सुवर्णपूर्ण रुचिरा ही आर्यमाता झणीं।
फोडूं मत्सरदुर्ग, गर्व, दुफळी, संमोह यांच्या बला।
उल्लंघूनि पुढें सरूं विषम ही दारिद्र्यसीमा, चला ॥

---

## १५ दिवाळी पाडवा.



( दिंडी. )

दीपकिरणांचे पाहुनिया भाले।
सैन्य तिमिराचें दूर पळुनि गेलें।
जमाखर्चाचा जुन्या वह्यांतूनी।
आज आढावा काढिती दुकानीं ॥ १ ॥
बघूं स्मरणाच्या चोंपडींत आज।
काय केलें गतसालिं कामकाज।
दुज्याचा किति उपकार जमा झाला।
किती अन्यहितीं काळ खर्च केला ॥ २ ॥

खचित होवो बाजू कमी जमेची।
मात्र खर्चाची फुगावी सदाची।
रुचो देवा! मज ही दिवाळखोरी।
भीति कसली? जरि तूं उभा समोरी॥

---

## १६ चार ओळींत रामायण.

( शार्दूलविक्रीडित किंवा राग मांड.)

जाई राम तपोवना, मृग वधी, सीतेसि नेलें खलें-।
लंकेशें वधिला जटायु; पुढतीं सुग्रीव रामा मिळे।
वाली निर्दळिला, समुद्र तरुनी लंकापुरा जाळिलें।
अंतीं रावण कुंभकर्ण वधिले; रामायणीं वर्णिलें॥

---

## १७ चार ओळींत भागवत.



( शार्दूलविक्रीडित किंवा राग मांड.)

जन्मा दे जरि देवकी, तरि घडे नंदा घरीं वर्धन।
मारी मायिक पूतनेस, उचली श्रीकृष्ण गोवर्धन।
मेला कंस, तसेच कौरव; पुढें कुंतीसुतां रक्षिलें।
ऐसें भागवतीं चरित्र हरिचें व्यासें असें गाइलें।

---

## १८ साधें पण सुंदर.

(अभंग—मांड.)

खडक ओसाड पडलासे रानीं।
परि ये आंतूनी गोड पाणी ॥ १ ॥
सागराचे माथीं फेन बहु नाचे।
परि आंत सांचे मोती नामी ॥ २ ॥
कोकिळ दिसतो वरूनि सांवळा।
कंठांत कोंवळा ध्वनि राहे ॥ ३ ॥
फणस नारळ कैसे बाहेरूनी?।
भरला अंतरीं रस गोड ॥ ४ ॥
केला साधा भोळा वेश साधुजनीं।
परी त्यांचे मनीं देव राहे ॥ ५ ॥

---

## १९ फूलपांखरूं.

(चाल-वीरा भ्रमरा.)

१

प्रथम न दिसलों कोणाला मी कणाएवढा असे।
जग मज लहान भारी दिसे।

२

मग पानाच्या सपाट ऐशा शयनीं मी पातलों।
वाढत कृमिरूपें राहिलों ॥

३

नंतर योग्यासम कोशाच्या गुहेंत मी जाउनी ।
रमलों जणों गूढ चिंतनीं ॥

४

रात्र सरोनी, प्रभात झाली, प्रभु मजला पावला ।
केलें फूल–पांखरूं मला ॥

५

या अवतारीं अफाट ऐशा वाऱ्याच्या सागरीं ।
फिरतों पोहत नानापरी ॥

६

रंग फुलां बहु, ईशें भरिले, बघावया ते, स्वतां ।
जातों उडुनि दूर मी अतां ॥

---

## २० माझें पुस्तक.



( चालः–हे प्रभो विभो.)

मुलगाः—( हातांत पुस्तक घेऊन त्यास म्हणतो.)

तूं लहानगें खरें संवगडी अससी ॥ धृ० ॥
तुज 'पानें' कितितरि असुनी ।
झाड न तुज म्हणती कोणी ।
बोलसी मूक राहूनी ॥
शिकविसी धडे मजसी ॥ १ ॥

मज जरी कधीं करमेना।
  तरि दावुनि चित्रें नाना।
घरबसल्या रमवोशि मना॥
  शिकविसी धडे मजसी॥ २॥
दूरच्या देशिंचे धरुनी।
  झाडें, पशु पक्षी प्राणी।
दाखविशी मज खुलवोनी॥
  शिकविसी धडे मजसी॥ ३॥
टाकिलें कुठें जरि तुजसी।
  नच राग तरी धरितोसी।
मम पुन्हां हजर सेवेसी।
  शिकविसी धडे मजसी॥ ४॥
पोटांत 'अर्थ' तव राही।
  तो लुटोनि न्यावा कुणिही।
कधिंही तो सरतचि नाहीं।
  शिकविसी धडे मजसी॥ ५॥

---

## २१ विनूचें गणित.

(शार्दूलविक्रिडित.)

धूळीला कपडे सदा मिळवितो; 'वेरीज' ऐशी करी।
'खाऊ द्या मज' हाचि याचित असे 'पाढा' विनू सत्वरी।

टाकी रोजचि खेळणीं हरवुनी, त्याची 'वजावाट' ती।
भारी हा मग 'भागतो,' विविध हीं कृत्यें' करोनी अती।
बोरांची 'सम' वांटणी करितसे मांडोनि "राशी" बरी।
अस्ताव्यस्त करोनि पुस्तक-निधी,हा'व्यस्त'पानें करी।
मांडी पाहुनि उत्तरें, करि अशीं 'संक्षिप्त कृत्यें' झणीं।
पंतोजीच-रिपू, 'समीकरण' हें ठेवी लिहूनी मनीं॥

* * *

चेष्टा यापरि तो करी, नच मुळीं दे लक्ष्य विद्येकडे।
पश्चात्ताप करीत केवळ बसे, ठोंब्या निघाला पुढें।

---

## २२ तान्हुल्याची झांकली मूठ.

( पिलु दादरा. चाल—छीनत नाहीं )

मूक गड्या तूं; नयन वदति बोला।
हलविति हृदयाला ॥ ध्रु० ॥
दुर्लभ मज तव सुख-धन म्हणुनी–।
हंससी भगिनीला ? ॥ १ ॥
मूठ चिमुकली मखमालीची–।
धरिसि दृढ कशाला ? ॥ २ ॥
काय लाविलें कांहिं लडिवाळा।
स्वर्गिच्या सुखाला ? ॥ ३ ॥

## २३ कारंजें.

( गज्जल )

उडे, नाचे, हंसे, खेळे कसें खालीं पडे वेगें।
भयें कांपे महावातें, तरी जाया वरी लागे।
सदा पावे विकारातें, परी दावी अभिन्नत्वा।
वरी खालीं उडावें हा विसावा एकची ठावा ॥ २ ॥
बघोनी रम्य कारंजें मनीं आनंद कोंदाटे।
जणों मोती धरा-माता प्रभूला अर्पिते वाटे।
प्रकाशीं रंग खेळायास येती त्या सखे सात।
निशा-कालीं हळू गीतें बसे हें एकलें गात ॥ १ ॥

## २४ झोंप-नगरी.*

( द्रुतविलंबित; बिलावत राग. )

दिवस दे प्रभु काम करावया।
रजनि ते श्रम सर्व हरावया।
गगनदीप रवि प्रभु फुंकितो।
मग तमोवसनीं जग झांकितो ॥ १ ॥

* रात्रीं अंथरुणावर पडल्यावर नाना तऱ्हेचे विचार करीत करीत, आपण कसे झोंपेच्या स्वाधीन होतों, तें या गीतांत दाखविलें आहे.

शयनिं मी पडतों झणिं जाउन ।
हळु हळूं मिटती मम लोचन ।
विविध रंग पुढें नव नाचती ।
किति तरी दिसती मज आकृति ॥ २ ॥
तरुलता फुलुनी डुलती वनीं ।
विहग बागडती रत गायनीं ।
झुळझुळ पळतो चिमणा झरा ।
विविध रंगविती घन अंबरा ॥ ३ ॥
दिसति धेनु तशीं बहु वासरें ।
करिति नाद गळ्यांतिल घुंगरें ।
मधुनि हंबरती, तृण भक्षिती, ।
मधुनि तीं बघतीं वनिं मागुतीं ॥ ४ ॥
नभिं किती धुळिचे ढग माजले ।
नयन होति जणूं मम आंधळे ।
भुलुनि मीहि तयांसह चाललों ।
त्वरित झोंप-पुरा मग पातलों ॥ ५ ॥

---

## २५ प्रभात.



(राग कालिंगडा. चाल-'निजरूप'.)

तुज येइ उषा उठावयाला । रंग गुलाली ।
ती बहु उधळी । म्हणुनि मिटसि का नेत्रांला ? ॥ ध्रु० ॥

उघडुनि लोचन। हें नव अंजन-। घालुनि पाहीं
सृष्टीला ॥ १ ॥
सुंदर फुलतें-। कमल सुचवितें। 'उघडिं उघडिं
निज नयनाला'॥ २ ॥
कुक्कुट कथितो। आरवुनी तो। निद्रेला दुरि
जायाला ॥ ३ ॥
गुणगुणनादें। तो भृंग वदे। 'मोदें लागा
कार्याला' ॥ ४ ॥
मधुर-रवांहीं। कोकिळ शिकवी। ईशाचें यश
गायाला ॥ ५ ॥

---

## २६ गिरणी कामगार.



(चाल-फटक्यासारखी किंवा 'उरलि न आतां अंतरिं मजला')

प्रभातकाळीं झोंपेमध्यें गुंगत असतांना शयनीं।
जागा होतों मी गिरणीचा 'भों भों' भोंगा ऐकोनी॥
त्वरें तयारी करुनी निघतों करीं शिदोरी घेउनिया।
धांवत धांवत गिरणीमध्यें जातों कामा लागाया॥
बिल्ला घेउनि अपुल्या नियमित जागेवरतीं मग जातों।
कामावांचुनि विचार दुसरा मनास कुठचा मग शिवतो॥
'खडखड' गाणें गात तेंच तें, यंत्र काम अपुलें करितें।
तुटुनि पडेतों पट्टा फिरतो, चुकचुनि काम न रेंगाळे॥

मजूर गिरणीमधें शेंकडों मधमाशीसम गुंगोनी ।
आपआपुलीं कामें करिती निजदेहाला विसरोनी ॥
'ठण ठण' मग सुट्टीची घंटा होइ, सूर्य येतां डोई ।
उघडुनि बघतां रुक्ष शिदोरी, कोंड्याचा मांडा होई ॥
सहभोजन मग झाल्यावर मी पुन्हां लागतों कामाला।
कामाची ती लाज सोडिली म्हणुनी आळस रिपु मेला ॥
सूर्य शिरे सागरांत तेव्हां मीही स्नान तसें करतों ।
त्याच्यासह मी कामा लागुनि, तयासारखा घरिं जातों
घरीं बायकामुलांबरोबर झोंपहि माझी वाट बघे ।
हांसत बोलत जेवुनि निजतों आनंदानें मग अवघे॥

संपत्तीच्या सरितेचे ।
उगमाचि आम्ही हो साचे।
विशाल बळ निजदेशाचें
राहणींत साध्या, संतोषें दिवस काढितों कष्टाचे ॥

---

## २७ लहानगा नावाडी.

( चाल—नृपममता. )

ताई म्हणते:—

पाळणा चिमुकली होडी । हा लहानगा नावाडी ।
तीवरी ।

लाडकीं खेळणीं कांहीं। त्यासवें प्रवासीं देई मी तया।
होडींत त्यास मी चढवीं। गात गात त्याला ओवी।
सुखभरें।
हा हळुहळु चाले दूर। जाहले मंद मग सूर। ओविचे।
तिमिराच्या दरियामधुनी। तो वल्हवी मिटल्या नयनीं।
एकला।
चहुं बाजुस काळें पाणी। होडींत झोंप बैसोनी।
जातसे।
लाभला सुखाचा वारा। नावेला नेत भरारा। चालला।
नाव ती रातभर फिरली। शेवटीं पहाट जहाली।
गोडशी।
रविकिरणांच्या मग पाहीं। या श्वेत समुद्रीं येई।
नाव ही।
सफर ही सुरक्षित झाली। होडींतुनि उतरे खालीं।
बाळ तो।
जोडिले ईश्वरा हात। जो सकलां दावी वाट। चांगली।
भेटला त्वरित आईला। हर्ष फार दोघां झाला।
अंतरीं॥

---

## २८ सुंदर देऊळ.



(धिन्ना धिन्ना.)

सुंदर मंदिर शीलाचें। रचूं जगाच्या मोलाचें॥

कनक, हिरे, माणिक, मोती । काय बापुडीं त्या पुढतीं? ॥
आधीं सत्याचा 'पाया' । धैर्याचे करुं 'खांब' तया ॥
निष्ठच्या 'भिंती' जाणा । पावित्र्याचा देउं 'चुना' ॥
ठेवुं दयेचीं त्या 'दारें' । निःस्वार्थाचे 'कळस' खरे ॥
'ध्वजा' मनोहर
फडके त्यांवर
कृतिची सुंदर
अशा मंदिरीं ईश वसे । अन्य स्थळिं नच तो गवसे ॥

---

## २९ बाजी देशपांडे.



(फटका.)

जोहारानें वेढा दिधला अहा ! पन्हाळा किल्ल्याला ।
शिवरायाला कोंडुनि धरिलें, खळें जसें धरि चंद्राला ॥
प्रसंग पाहुनि शिवबा वागे चतुराईनें शत्रूशीं ।
निघे रांगण्याकडे रात्रिंचा घेउनि निवडक सेनेसी ॥
घोडखिंड वाटेंत लागली, बाजीस म्हणे त्या स्थानीं ।
'इथें शत्रुला अडवूनि धरा, छातीचा तट बांधोनी ॥
गडास मी सुखरूप पोंचतां तोफा देतिल आवाजा ।
तोंवरि रिपुला धीट मराठी खड्गाचें पाणी पाजा' ॥
असें वजावुनि शिवबा गेले; बाजी अढळ ध्रुव बसला ॥
वाट बघे दुरुनी शत्रूची, मावळ्यांस वच हे बोले:— ॥

तारे मावळतात सकाळीं, वठतीं हिमकालीं पानें।
सायंकाळीं सूर्य बुडे, परि न कळे वीरा कधिं जाणें ॥
जळीं, स्थळीं पवनीं कोठेंही मृत्यु जरी घिरट्या घाली।
स्मरुनि भवानी मरुं वा मारूं,स्वामिकार्य करुं या कालीं।
क्षणांत आली जोहाराची सेना बोलत "या अल्ला"।
बाजीच्या त्या शूर मावळ्यांवरी तिनें केला हल्ला ॥
सेना-सागर गर्जू लागे, लाटा, फेंस बहुत उसळे।
स्वतंत्रतेचे पुत्र मावळे अडवुनि धरिती त्यांस बळें ॥
बाजी लढला शिर करिं घेउनि, झाले अंगा जरि वार।
अखेर छातीचा तट खचला! रणभूमिसि पडे वीर ॥
म्हणे 'अवेळीं शिरली गोळी- थांब उताविळ रे मरणा!'।
तोंचि ऐकिल्या तोफा त्यानें, म्हणे हर्षुनी तो स्वजना॥
"शिव-कार्यी तनु-सुमन अर्पितों सोडुनि रक्ताचें पाणी;
भाग्य लागतें लाभायाला अक्षय शय्या रणांगणीं ।"

* * *

हाय! घोडखिंड ती कशाची! तोंडच केवळ मरणाचें।
अजुनी तेथें कानीं घुमती शब्द बाजिचे अखेरचे ॥

---

## ३० मातृभूमि.



(गज्जल.)

ही रम्य मातृभूमि। सर्वस्व मानितों मी।
चित्तास ही विसावा। वाटे अमूल्य ठेवा ॥

भालीं हिमाद्रि-चंद्र, । लोळे पदीं समुद्र ।
गंगादिकीं नद्यांहीं । समृद्ध सर्वदा ही ॥
झाडें, फुलें, लतांनीं । शोभे निसर्ग-राणी ।
सोनें, रुपें, हिऱ्यांनीं । होत्या सुपूर्ण खाणी ॥
तेणें गमे अनेकां । ही अर्थपूर्ण नौका ।
या भूमि मर्त्यलोका । स्वर्गातुनी गळे का ? ॥
सत्पुत्र हो शिवाजी । विश्वास तेंवि बाजी ।
सीता, जिजा, अहिल्या । या भूषणें जहाल्या ॥
ज्ञानेश, रामदास । वागीश कालिदास ।
हे कालसागरांत । गेले ! तरी जिवंत ॥
जी काल रत्न होती । का गार आज हो ती ! ।
सिंहीण काल हो जी- । का होय गाय आजी ? ॥
माता, पिताहि, देव । आम्हांस ही सदैव ।
आधीं नमू तियेला । मागाहुनी दुज्याला ॥
वेंचो तदर्थ नित्य । वाणी, शरीर, वित्त ।
राखावया सु-कीर्ती । माझ्या शिणोत शक्ति ॥



